(२२३)

201504231206106 27

फणसपाडा खर्डी कोशिंबे खारभूमी योजना ता.वसई, जि.ठाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- खाभूयो २००८/(१६८/२००८)/ खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ६/०१/२००९.

पहावे :- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्रमांक फणसपाडा, खर्डी कोशिंबे/३८०८/तां१/(१)/२०५८, दिनांक २७.३.२००८

**प्रस्तावना :-**

फणसपाडा खर्डी कोशिंबे खारभूमी योजना ता.वसई, जि.ठाणे ही योजना बोर्डकालीन असून बृहत आराखडयात समाविष्ट आहे. या योजनेस केंद्रीय पर्यावरण व वन विभागाच्या दि.२२.८.२००३ च्या पत्रान्वये किनारी अधिनियम १९९१ मधून सूट मिळाली आहे. योजनेच्या सुरुवातीस अलिकडे वैतरणा नदीस सुर्या, तानसा या नद्या मिळतात. त्यामुळे योजनेच्या बांधास सततच्या पुराचा तडाखा बसतो. तसेच सततच्या भरती ओहटीमुळे बांधाची धूप झाली असून बांधाचा काही भाग दबला आहे. सदर योजनेच्या नुतनीकरणासाठी लाभधारकाकडून वारंवार मागणी होत आहे.

२. सदर खारभूमी योजनेच्या फक्त बांधाचे नुतनीकरण प्रस्तावित आहे. फणसपाडा खर्डी कोशिंबे खारभूमी योजना ता.वसई, जि.ठाणे या योजनेच्या रू.१४०.६६ लक्ष (शा.नि.दि.२०.८.२००८ नुसार अनुषंगिक खर्च १० टक्के प्रमाणे रू.१२३.२९ लक्ष) एवढया किंमतीचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी शासनास सादर केला होता. तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

फणसपाडा खर्डी कोशिंबे खारभूमी योजना ता.वसई, जि.ठाणे या योजनेस सन २००७-२००८ च्या दरसुचीवर आधारित, प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये १,२३,२८,५७१/- (रूपये एक कोटी तेवीस लाख अठ्ठावीस हजार पाचशे एकाहत्तर फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रू.१,१२,०७,७९२/-व अनुषंगिक खर्च रू.११,२०,७७९/- एवढया रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे योजनांतर्गत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००६/प्र.क्र.(८२/०६) विनियम दि.१३.३.२००७ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता ( १ /२००८) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रा.च.हुमणे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आतंर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे (सोबत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, कोंकण पाटबंधारे विकास मंडळ, ठाणे.
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, ठाणे
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २००८/(१६८/२००८) खारभूमी दिनांक ६/१/२००९ चे सहपत्र
फणसपाडा खर्डी कोशिंबे खारभूमी योजना ता.वसई, जि.ठाणे अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | बाब | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | ---- |
| २ | "ब" (भूसंपादने) | ---- |
| ३ | "सी" मुख्य कामे | ८४६५४८५ |
| ४ | "एफ" उवाडी काम | --- |
| ५ | "के" इमारती | ८४६५५४८ |
| ६ | "एम" वृक्षारोपन | ४८३५९ |
| ७ | "ओ" संकिंर्ण | ४२३२७ |
| ८ | "पी" देखभाल | २११६४ |
| ९ | "आर" दळणवळण | १७८३९०८ |
| | कामाप्रित्यर्थ किमत | ११२०७७९२ |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन किमत वगळून १० टक्के) | ११२०७७९ |
| | एकूण | १२३२८५७१ |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुनःप्रापित क्षेत्र | ४३३ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | २८४७२ < ९५००० (मापदंडात बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर | २.१९ > १.०० (मापदंडात बसते) |
| दरसूची वर्ष | २००७ ०८ |